असा. क्र. १९९ रजिस्टर्ड नं. टीईसीएच/४७-३०३/एमबीआय/२००३-०५





# महाराष्ट्र शासन राजपत्र

## असाधारण

**प्राधिकृत प्रकाशन**

**सोमवार, सप्टेंबर २६, २००५/आश्विन ४, शके १९२७**

**स्वतंत्र संकलन म्हणून फाईल करण्यासाठी या भागाला वेगळे पृष्ठ क्रमांक दिले आहेत.**


## भाग चार-ब

**महाराष्ट्र शासनाने महाराष्ट्र अधिनियमांन्वये तयार केलेले (भाग एक, एक-अ आणि एक-ल यांमध्ये प्रसिद्ध केलेले नियम व आदेश यांव्यतिरिक्त) नियम व आदेश.**

### गृह विभाग

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२, दिनांक २६ सप्टेंबर २००५

**अधिसूचना**

**मुंबई दारूबंदी अधिनियम, १९४९.**

क्रमांक एफएलआर. ११०४/सीआर-२१/इएक्ससी-२.—ज्याअर्थी, महाराष्ट्र शासनास, मुंबई विदेशी मद्य नियम, १९५३ यात सुधारणा करण्यासाठी खालील नियम ताबडतोब अंमलात आणणे आवश्यक वाटते आणि म्हणून, मुंबई दारूबंदी अधिनियम, १९४९ (१९४९ चा मुंबई २५) याच्या कलम १४३ च्या पोट-कलम (३) च्या परंतुकामधील तरतुदीनुसार पूर्वप्रसिद्धीशिवाय करावयाचे आहे.

त्याअर्थी, आता, उक्त अधिनियमाच्या कलम १४३ च्या पोट-कलम (२) च्या खंड (ब) आणि (क) द्वारा प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांचा आणि त्या बाबतीत त्यास समर्थ करणाऱ्या इतर



[किंमत : रुपये ३.००]

सर्व अधिकारांचा वापर करून महाराष्ट्र शासन याद्वारे, मुंबई विदेशी मद्य नियम, १९५३ यात आणखी सुधारणा करण्यासाठी खालील नियम करीत आहे :—

१. या नियमांना मुंबई विदेशी मद्य (चौथी सुधारणा) नियम, २००५ असे संबोधण्यात यावे.

२. मुंबई विदेशी मद्य नियम, १९५३ (यात पुढे ज्याचा उल्लेख " मुख्य नियम " असा करण्यात आला आहे) यांच्या नियम ३२ मधील पोट-नियम (एक), खंड (ड) मधील " १८ वर्षांहून कमी वय नसलेल्या " या मजकुराऐवजी " २१ वर्षांहून कमी वय नसलेल्या " असा मजकूर अंतर्भूत करावा.

३. मुख्य नियमाच्या नियम ५२ मध्ये,—

(१) पोट-नियम १ मधील,—

(अ) " १८ वर्षांहून कमी वय नसलेल्या " या मजकुराऐवजी " २१ वर्षांहून कमी वय नसलेल्या " असा मजकूर अंतर्भूत करावा.

(ब) पोट-नियम १ च्या परंतुकामधील " १८ वर्षांहून कमी वय नसलेल्या " या मजकुराऐवजी " २१ वर्षांहून कमी वय नसलेल्या " असा मजकूर अंतर्भूत करावा.

(२) पोट-नियम (२) मधील " १८ वर्षांहून कमी वय नसलेल्या " या मजकुराऐवजी " २१ वर्षांहून कमी वय नसलेल्या " असा मजकूर अंतर्भूत करावा.

४. मुख्य नियमाच्या नियम ५७ मधील पोट-नियम (एक) खंड (अ) च्या परंतुकामधील " १८ वर्षांहून कमी वय नसलेल्या " या मजकुराऐवजी " २१ वर्षांहून कमी वय नसलेल्या " असा मजकूर अंतर्भूत करावा.

५. मुख्य नियमाच्या नियम ७०-डी मध्ये,—

(१) पोट-नियम (१) मधील " २१ वर्षांहून कमी वय नसलेल्या " या मजकुराऐवजी " २५ वर्षांहून अधिक वय असलेल्या " असा मजकूर अंतर्भूत करावा.

(२) पोट-नियम (२) मधील " २१ वर्षांपेक्षा कमी वय नसलेल्या " या मजकुराऐवजी " २५ वर्षांहून अधिक वय असलेल्या " असा मजकूर अंतर्भूत करावा.

(३) पोट-नियम (३) मधील " २१ वर्षांपेक्षा कमी वय नसलेल्या " या मजकुराऐवजी " २५ वर्षांहून अधिक वय असलेल्या " असा मजकूर अंतर्भूत करावा.

६. मुख्य नियमाच्या नियम ७०-एफ मध्ये,—

(१) पोट-नियम (१) मधील " अठरा वर्षे " या मजकुराऐवजी " एकवीस वर्षे " असा मजकूर अंतर्भूत करावा.

(२) पोट-नियम (३) मधील " एकवीस वर्षे " या मजकुराऐवजी " २५ वर्षे " असा मजकूर अंतर्भूत करावा.

७. मुख्य नियमाच्या नियम ७०-जी मधील पोट-नियम (१) मध्ये " २१ वर्षांपेक्षा कमी नाही " या मजकुराऐवजी " २५ वर्षांपेक्षा कमी नाही " असा मजकूर अंतर्भूत करावा.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**गो. जो. रसाळ,**
शासनाचे उप सचिव.

## HOME DEPARTMENT

Mantralaya, Mumbai 400 032, dated 26th September 2005

### *NOTIFICATION*

BOMBAY PROHIBITION ACT, 1949.

No. FLR. 1104/CR-21/EXC-2.— Whereas the Government of Maharashtra considers that the following rules further to amend the Bombay Foreign Liquor Rules, 1953, should be brought into force at once, and therefore, the rule should be made without previous publication as provided by the proviso to sub-section (*3*) of section 143 of the Bombay Prohibition Act, 1949 (Bom. XXV of 1949);

Now, therefore, in exercise of the powers conferred by clauses (*b*) and (*k*) of sub-section (*2*) of section 143 of the Bombay Prohibition Act, 1949 (Bom. XXV of 1949) and of all other powers enabling it in that behalf, the Government of Maharashtra hereby makes the following rules, further to amend the Bombay Foreign Liquor Rules, 1953, namely :—

1. These rules may be called the Bombay Foreign Liquor (Fourth Amendment) Rules, 2005.

2. In rule 32 of the Bombay Foreign Liquor Rules, 1953 (hereinafter referred to as "the principal rules"), in sub-rule (i), in clause (*d*), for the figure and word "18 years" the figure and word "21 years" shall be substituted.

3. In rule 52 of the principal rules,—

(*i*) in sub-rule (1),—

(*a*) for the figure and word "18 years" the figure and word "21 years" shall be substituted.

(*b*) in the proviso to sub-rule (1), for the figure and word "18 years" the figure and word "21 years" shall be substituted.

(*ii*) in sub-rule (2), for the figure and word "18 years" the figure and word "21 years" shall be substituted.

4. In rule 57 of the principal rules, in sub-rule (1), in the proviso, to clause (*a*), for the figure and word " 18 years " the figure and word " 21 years " shall be substituted.

5. In rule 70-D of the principal rules,—

(*i*) in sub-rule (1), for the figure and word " 21 years " the figure and word " 25 years " shall be substituted.

(*ii*) in sub-rule (2), for the figure " 21 years " the figure and word " 25 years " shall be substituted.

(*iii*) in sub-rule (3), for the figure " 21 years " the figure and word " 25 years " shall be substituted.

6. In rule 70-F of the principal rules,—

(*i*) in sub-rule (1), for the words " eighteen years " the figure and word " 21 years " shall be substituted.

(*ii*) in sub-rule (3), for the words " twenty-one years " the figure and word " 25 years " shall be substituted.

7. In rule 70-G of the principal rules, in sub-rule (1), for the words " twenty-one years " the figure and word " 25 years " shall be substituted.

By order and in the name of the Governor of Maharashtra,

G. J. RASAL,
Deputy Secretary to Government.

शासकीय मध्यवर्ती मुद्रणालय, मुंबई